# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 41 कुहना परिव्राजक वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।    श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।।    ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४१ पान २३५ कथाभाग भास्कराचार्य पुढच्या वेळी वाणीच्या प्रकारांचे विवरण शंकर भट्ट आणि धर्मगुप्त यांना करतात.<br>श्रीपाद हे महा सरस्वती, महाकाली आणि राजराजेश्वरी स्वरूप आहेत याची प्रचिती देवीचे अनुष्ठान करणाऱ्यांना येते. आम्हाला श्रीपादांनी कुठल्या परिस्थितीत पीठिकापुरातून गमन केले याची उत्सुकता लागली होती. यावर भास्कर शास्त्री सांगू लागले. त्या सुमारास एक दत्त भक्त कुक्कटेश्वर मंदिरात आले. ते भरपूर दक्षिणा घेऊन दत्त दीक्षा देत. आपल्या सर्व मनोकामना पूर्ण होतील म्हणून अनेकांनी ब्राह्मणाचे बोलणे खरे मानून दीक्षा घेतली. पण नंतरच्या काळात वाद झाला की दत्त दीक्षा देताना दक्षिणा घ्यावी कि नको?<br>बापन्नाचार्यांनी या धर्म परिषदेचे अध्यक्षपद भूषविले. उद्या आचार पालन न करणारे अठरा पगड जातीच्या लोकांना ही दत्त दीक्षा मिळाली तर अनाचार माजेल. असा सार्वजनिक सूर होता. बापन्नाचार्यांनी म्हटले, सर्व कुळात आचारवंत आणि अनाचारवंत असतात. त्यामुळे सामुहिक कल्याण आणि श्रेयाच्या दृष्टीने आपण दत्त होम, याग करून सामाजिक कल्याण साधू | <br><br>कुकुटेश्वर मंदिर, पीठापुरम<br>२.श्रीपाद स्वतःदत्त असल्याचे प्रकट करणे या तणातणीनंतर काही शेतकरी श्रीपादांना भेटले. ४० दिवसांच्यादी सोपस्कारांनंतर दीक्षा घ्यावी तर दक्षिणा परवडत नाही म्हणून काय करावे याबाबत ते विचारणा करत असताना श्रीपाद म्हणाले, ' निराश होऊ नका, मी तुम्हाला ब्राह्मण किंवा अन्य कुळातील असे भेदभाव न करता एका दिवसात दीक्षा देतो. म्हणून अठरा पगड जातीच्या लोकांना दीक्षा दिली. या दीक्षा दानाच्या वेळी मीच श्रीदत्त आहे असे उघडपणे सांगून या पुढील विस्तृत कार्यासाठी बाहेर पडणार आहे असे जाहीर केले.<br>त्या नंतरच्या शुक्रवारी पहाटे नरसिंह वर्मांनी, श्रेष्ठींनी त्यांना स्नान घातले. आपल्या घरी माता-पिता, अजोबा, सर्वांना उद्देशून म्हणाले, भक्त बोलवत आहेत. पीठापूर सोडायची वेळ आली आहे. आईला अतीव दु:खातून सांत्वन करण्यासाठी त्यांनी तिला अनघलक्ष्मीचे रूपात दर्शन दिले. या स्वरूपात दोन्ही भावांना स्पर्श करून त्यांची व्यंगे दूर केली. बंधू श्रीधर समर्थ रामदास म्हणून आणि रामराज श्रीधर स्वामी म्हणून महापुरुष जन्मतील. नरसिंह वर्मा छत्रपती शिवाजी |

शकतो. यथा शक्ती दान स्वीकारले जावे.
या धर्मचर्चेला विकृत स्वरूप तेंव्हा आले जेव्हा इतरांबरोबर ते, श्रींचे माता-पिता, दत्त दीक्षा सध्या आलेल्या संन्याशांकडून घेणार का नाही?
बापन्नाचार्यांनी आम्ही सामुहिक कल्याणकार्य म्हणून दीक्षा स्वीकारू. व्यक्तीगत श्रेयासाठी दीक्षा घेणार नाही आणि दक्षिणा देणार नाही. बाकीच्यांनी काय करावे ते त्यांच्या स्वातंत्र्याचा प्रश्न आहे. यावर श्रेष्ठींनी आणि नरसिंह वर्मांनी बापनार्यांच्या बाजुने मत दिले.

म्हणून जन्मतील...
असे  धन्यवाद करून सर्वांच्या डोळ्यासमोर अंतर्धान पावले!

अध्याय ४१ समाप्त.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय - 42

# पीठिकापुरात नामस्मरण विख्यात होणे

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४२ पान २४० कथाभाग भास्कराचार्य दुपारच्या भोजनानंतर शंकर भट्ट आणि धर्मगुप्त यांना पुढच्या घटना कथन करतात.<br>१. श्रीपादांनी क्षुद्र गृही जाऊन दत्त दीक्षा दिली, तीही एकाच रात्रीची! शिवाय पारंपारिक पद्धतीने दीक्षा विधी न करता, पूजाअर्चा न करता भक्तांच्या हाताला फक्त दोरा बांधला व त्यांना भजन करायला सांगितले. हे सर्व शास्त्राविरुद्ध आहे. तसेच स्वतला दत्त म्हणून सांगणे व स्मरण करताच भक्तांचे कष्ट निवारण होतील, असे प्रगटित करणे, ही शास्त्राची एक प्रकारे अवहेलनाच आहे, असे समजून काही ब्राह्मणांनी हे सर्व शंकराचार्यांना कळवून बापन्नार्य व अप्पलराज शर्मांना ब्राह्मण कुलातून बहिष्कृत करावे असे ठरवले.<br>इतक्यात श्रीपादवल्लभ अंतर्धान पावले, ही बातमी गावात पसरली. व तो चर्चेचा विषय | <br>२. ही सर्व हकिकत कुक्कुटेश्वर मंदिरातील संन्याशाला कळाली. ते घाबरले. सांत्वनासाठी दांभिकपणे गेलेल्या ब्राह्मण वर्गाला तो गेल्याचे दुख्ख न वाटता तेही आनंदी असल्याचे पाहून त्यांचा विरस झाला.<br>तिकडे दत्त दीक्षा देऊन धनवान झालेल्या संन्याशाला आपल्या कृत्यांची लाज वाटली. या जमवलेल्या संपत्तीचे करायचे तरी काय? असा पेच निर्माण झाला. या अवधीत कश्यप गोत्री एक ब्राह्मण कुक्कुटेश्वर मंदिरात आला. तो महाराष्ट्रातून आला आहे, नाव नरसिंह आहे असे म्हणाला. मी भरपूर दक्षिणा देतो मला दत्त दीक्षा द्या म्हणू लागला. लालची संन्याशाने भरपूर दक्षिणा घेऊन हातावर झारीतून उदक सोडले. मात्र त्यातून विंचू बाहेर पडला. त्याच्या दंशाने ब्राह्मणाच्या तोंडातून फेस बाहेर यायला लागला. हे काम संन्याशाने तंत्र मंत्राने केले आहे |
| ३. बनला. या गोष्टीचा गवगवा झाला. पीठिकापुरात शंकराचार्यांची | ४. काही कुटाळ ब्राह्मण वेंकटपय्या श्रेष्ठींचे घरी गेले काही काही नरसिंह वर्मांकडे गेले. त्यांच्या प्रतिक्रिया आनंदी होत्या. |

अनुमती नसताना कुठल्याही अध्यात्मिक गोष्टी विषयी मुक्त विधान करण्याचा अधिकार नसतो. परंतु येथे तर सोळा वर्षे वयाचा बालक 'मी साक्षात दत्त प्रभूंचा अवतार आहे असे ठामपणे सांगत आहे. हा देव द्रोहच आहे असे काही ब्राह्मणांना वाटले. धर्म सभेत बापन्नाचार्यांनी विचार व्यक्त केले की दत्तांनी आता दत्त स्वरूप विश्वव्याप्त करायला सुरवात केली आहे. तो महाप्रभू श्रीपादवल्लभ रूपाने आमच्या घरात वावरला, आम्हाला दिव्य आनंद दिला. आमच्या दृष्टीतले मायेचे पडदे त्याने दूर सारले. त्यामुळे त्यांचे दिव्य दर्शन पूर्वीपेक्षा जास्त वेळा आमच्या अंतर्दृष्टीस होत असते. आम्ही खरोखर धन्य आहोत. हे ऐकून ब्राह्मण हादरलेच. दुष्ट हेतूने सहानुभूतीचा आव आणून ते अप्पलराज शर्मांच्या घरी गेले. पाहतात तर ते, पत्नी सुमती महाराणी तिचे भाऊ बहिणी , श्रींची भावंडे सर्व मोठया आनंदात होते! तासांच्या सहवासापेक्षा अधिक सूक्ष्म दर्शनाने होतो असे म्हटले.

उलटपक्षी श्रींच्या काही कोणत्याही क्षणी कोणत्या अफवा पसरतील व त्या अफवांमधे कोण कसा फसेल, हे देवालाच माहित!

त्या संन्याशावरील विश्वास उडाला. अठरा पगड जातीच्या लोकांचा संन्याशावरील विश्वास उडाला. त्याने दक्षिणा म्हणून जमवलेले धन काढून घेतले गेले. पण मारहाण न करता त्याला हाकलून दिले गेले...

त्या पैशातून अठरा पगड जातीच्या सर्वांना यथेच्छ जेवू घालवावे म्हणून छान अन्नसोहळा साजरा झाला. हे केले तर वेगळी दत्त दीक्षा घ्यायची गरज नाही असे बापन्नार्यांनी म्हटले. त्यामुळे सर्व लोक पुन्हा बापन्नाचार्यांना मानू लागले. श्रीपादांनी दीक्षा घेतलेल्यांनी, 'दत्त दिगंबर! दत्त दिगंबर! श्रीपादवल्लभ! दत्त दिगंबर! असा नामजप रूढ केला.

अध्याय ४२ समाप्त.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय ४३
# श्री अनघा लक्ष्मी वर्णन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४३ पान २४३<br>श्री अनघा लक्ष्मी वर्णन - श्रीपादांची वैष्णव माया<br>भास्कर पंडित रात्रीच्या पूजेनंतर शंकर भट्ट आणि धर्मगुप्त यांचे बरोबर चर्चा करतात. माझा गोंधळ उडाला आहे. हे श्रीपाद आहेत तरी कोण? आपण ते वेंकटेश्वर स्वरूप आहे म्हणता, त्रिमाता तेच म्हणता, अनघा लक्ष्मी आणि अनघ स्वामी ही तेच? हे कसे काय? सविस्तर माहिती सांगावी.<br>महापंडित भास्कराचार्य म्हणतात, श्रीपाद चैतन्य रूप आहेत. म्हणून ते विविध रूपात व्यक्त होतात. असे समजा की स्त्री रूपात या विश्वाचे पालन करायला<br><br>।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो | <br>२. चार शक्ती प्रगटल्या. महा सरस्वती महा लक्ष्मी, महा काली आणि राजराजेश्वरी. या तीन पातळ्यांवर काम करतात. १.अतीत स्थायी २ विश्व स्थायी ३ व्यक्ती स्थायी यांनी चैतन्याला आकर्षित केल्यावर प्रपंच सृष्टी निर्माण होते.<br>राजराजेश्वरी महिमा<br>महालक्ष्मीला सौंदर्य शोभा असते. महा सरस्वती ज्ञान आणि कर्म नैपुण्य याचा अविष्कार आहे.<br>आनंद हा परमेश्वरापाशी संबंधित विषय आहे ज्याला कशाची इच्छा नसते त्याला होणाऱ्या आनंदाला हर्ष म्हणतात. असो.<br>बेटा, शंकर भट्टा तू श्रीपाद श्रीवल्लभ चरितामृत नावाने रचना करशील त्यामुळे श्रद्धा आणि भक्ती पूर्वक वाचणाऱ्यांच्या मानसिकतेत बदल घडून येथील.<br>अध्याय ४३ समाप्त |

# अध्याय - 44

# स्वर्ण पीठिकापुर वर्णन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 44 पान 247. कथाभाग<br>1. श्रीपाद पीठिकापुरातून अंतर्धान झाल्यावर गेले कुठे? ते पोहोचले काशी नगरात. गंगा स्नान करून ध्यानावस्थेत गेले.<br>पीठिकापुराचे काय वैशिष्ट्य? या प्रश्नाचे उत्तर देताना भास्कर पंडित म्हणाले, की हो शरीराने तर पीठिकापुरात जाता येते तसे एक स्वर्ण पीठिकापुर आहे. ते योगी | 2. आणि महापुरुषांच्या ज्ञान आणि ध्यान चक्षूंना अनुभवता येते.<br>स्वर्ण काशी देखील अशीच ज्ञान डोळ्यासमोर दिसणारी काशी आहे. म्हणून काशीला श्रीपादांचे गमन झाले. मानवी शरीरात विविध कोष असतात. त्यातील विज्ञानमय कोषातून आनंदमय कोषात स्वर्ण काशीचे अनुभव मिळतात. |
| 3. ते ऐकून शंकर म्हणाले, मी अल्प मती आहे. पंचक्रोश काशी यात्रा करावी मग फार पुण्य मिळेल म्हणतात. हो ते खरे आहे. तसेच कुरवपुरात पंचपहाड दरबारात ही मानसिक आणि शारीरिक यात्रा करता येते.<br>पंडित भास्कर म्हणाले, 'तू श्रीपादवल्लभ चरित्र लिहिणार आहेस. तो अक्षरसत्य ग्रंथ असेल. | 4. पण लक्षात ठेवा की तू हा ग्रंथ लिहिणे हे एक निमित्त मात्र आहे. श्रीपादच हा ग्रंथ तुझ्याकडून लिहवून घेत आहेत. '<br>हे आपण म्हणता ते अक्षरशःसत्य आहे. मी पंडित नाही. वेदवेदांत जाणत नाही. अशा या अल्पज्ञा कडून एवढ्या मोठ्या महत्कार्याचे निर्वाहन होते आहे हे आश्चर्यकारकच वाटते. |
| 5. पण त्याच बरोबर ते आनंदकारकही आहे हे ही समजू शकते! शंकर भट्ट थक्क होत म्हणाले. (या ग्रंथनिर्मितीसाठी सुरवातीपासून ते वेळोवेळी घडत असलेल्या घटनांचे टाचण करून ठेवत असावेत)<br>पंडित भास्कर म्हणाले, त्यांच्या दिव्य शक्तीचे हे निर्देशकच आहे हो! | 6. हाच मुद्दा धरून पीठिकापुरात श्रींच्या बालपणातील एक घटना आठवून सांगतात.<br>एक संन्यासी कुक्कुटेश्वर मंदिरात आला होता. श्री नरसिंह वर्मा, वेंकटपय्या श्रेष्ठींचे घोडा गाडीने श्रींसह त्या मंदिरात आगमन झाले. ध्यानस्थ संन्याशाला उद्देशून श्री म्हणाले, हा मासे पकडणारा कोळ्याला इथे येऊ कसे दिले? |
| 7.ते ऐकून संन्याशाला राग आला. पण आपल्या अंगातून माशांचा वास येत आहे असे जाणवले. योगदृष्ट्या याचा अर्थ असा की काय? अशा विचारात असताना श्री म्हणाले, कमंडलूत छोटे छोटे मासे कसे फिरतायत पहा!<br>।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो | 8.ते पाहून संन्याशाला आपल्या शरीरातील कण अन कण माशा समान चैतन्यमय चलन वलन करत आहे असे जाणवले!<br>अरे कूर्म होऊन तो जसा आपले डोके कवचात लपवितो तसे कर. अंतर्मुख हो. योगाभ्यास करून कर्म बंध मुक्त हो!...अध्याय ४४ |

# अध्याय - 45
# काशीत श्रीपादांचा निवास

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 45, पान कथाभाग<br>1. भास्कर पंडितांनी काशीमध्ये घटनांची माहिती दिली<br>काशीतील श्रीपादांचे वास्तव्य वर्णन करताना भास्कर पंडित दुपारच्या जेवणानंतर म्हणाले, ' मी नरसिंह सरस्वती नावाने पुन्हा अवतरेन. नंतरच्या शतकात श्यामाचरण या गृहस्थाश्रमी व्यक्तीला हनुमान क्रियायोगाची दीक्षा देतील. पुढे श्रीपादवल्लभ योगमार्गाने बदरीबनात पोचले. तिथे हनुमंताला त्याच्या चिरंजीव पणाची आठवण देऊन तू साई नावाने विख्यात होशील. तू शिवांश संभव असून रामभक्त देखील झालास. छान, अरबी भाषेत अल्ल म्हणजे शक्ती व अह म्हणजे शाक्त. या दोन्हीचे एकत्र अल्लाह या नावाचे स्मरण करीत म्लेंच्छ जातीला मान्य माझी आराधना कर. हनुमान म्हणाले, 'अल्लाह मालिक '! यापुढे तुला नाथ हा शब्द देत आहे. प्रभू मी सनातन आणि म्लेंच्छ धर्मातील चांगल्या गोष्टींचा समन्वय साधेन.<br>3. याचवेळी श्रीपाद म्हणाले, मी गोपाळ राव नावाने साक्षात महाविष्णूला तुझा गुरू म्हणून प्रसाद देत आहे. तो वेंकसा म्हणून बोलावला जाईल. त्याच्या शरीरपतनानंतर त्याचे भस्म माठात घालून तो माठ पुरून ठेवावा. माझ्या सूचनेनंतर त्या माठातून तुला वेंकटेश्वराची मूर्ती निघेल. तिची आराधना केली तर मी प्रसन्न होईन.<br>याठिकाणी शंकर भट्ट श्रींच्या वेंकावधानी नामक मामांशी झालेला संवाद आठवून म्हणाले, तो सांगतात<br>।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।। | 2. मेहबूब सुभानी या महाज्ञानीला वारिश अलि शा हा तुला त्या अवतारात गुरू लाभेल. आणखी काही वरदान हवे तर माग. '<br>प्रभू, मी वैष्णवीचा अनुग्रह मागतो. म्हणून रामनामाच्या उच्चारात मी रंगून माणिक माला तोडली होती. या अपराधासाठी मला क्षमा करा. यावर श्रीपाद म्हणाले, दैव सानिध्यात कारणाशिवाय कार्य घडत नाही. तो हार दत्त स्वरूप होता. म्हणून तू पुढील शतकात माणिकप्रभू म्हणून विख्यात होवो.<br>सर्व ऋषिवृंद आश्चर्याने पहात असता माता अनसूया प्रकट झाल्या. मला प्रसववेदना व्हायला हव्या होत्या. त्यातील माधुर्यपूर्ण वेदनेचा अनुभव मला हवा आहे. काही काळ त्या मातेला वेदना झाल्या... आणि त्यांच्या मांडीवर एक बालक मातेच्या स्तनपान करताना दिसले...<br>4. एका झाडावर बसून वेदोच्चारण करणाऱ्या वानराला पाहून मामा झाडालाही अवतार असतात का? 'झाडातून बीज बनते त्याचा पुन्हा वृक्ष बनतो म्हणजे पुनर्जन्म होतो. तेवढ्यात एक नारळ झाडावरून खाली पडला. ' हे त्या कथनाची सत्यता दर्शन होते. असे शंकर भट्टांना वाटते. शंबलभागातील स्फटिक पर्वतातील जल प्याल्याने श्रीपाद नंतर जीवनभर १६ वर्षाचे दिसत असत. नंतर श्री गोकर्ण (महाबळेश्वर) क्षेत्रात ३ वर्षे होते नंतर तेथून श्री शल्य क्षेत्रात आर्द्रा नक्षत्रांत चातुर्मासात |

**अन्य माहिती**- वयाच्या १६ वर्षी म्हणजे इ.स. १३३६ मध्ये श्रीपादांनी पिठापुर सोडले व ते प्रयाग संगमावर प्रकट झाले. साधु, मुनी, योग्यांना वर देत श्रीपाद बद्रीक्षेत्र मार्गे नेपाळमधील पर्वतावर आले. रामनामात तल्लीन हनुमंतास त्यांनी धिशीला (शिर्डी) नगरीत स्वत: बरोबर स्वामी समर्थ अवतार संपताच, साईबाबा अवतार घेणार असल्याचा आशिर्वाद दिला. श्रीपाद हनुमंतास म्हणाले की माझ्यात लीन असलेला महेबूब सुभानीस वारिश अली शाह नावाने साईबाबांना योगगुरु म्हणुन पाठवेन. त्यानुसार साईबाबा (आत्माराम नरहरपंत भुसारी-भारद्वाज गोत्र) जन्मगांवी पाथरी येथे ४ वर्षांचे असताना वारिश अली शाह तेथे आले व साईबाबांना स्वत: बरोबर औरंगाबाद येथे घेउन गेले. सर्व योगरहस्य देऊन साईबाबा १२ वर्षांचे झाल्यावर म्हणजेच ८ वर्षांनी परत पाथरी येथे घरी पोहोचले. श्रीपादांनी हनुमंतास सांगितले होते की "व्यंकुसा" म्हणजेच महाविष्णु तुला साई अवतारात "गोपालराव" नावाने पाठवत आहे. त्यानुसार उमरखेड येथील गोपालराव माधवराव देशमुख हे भारत भ्रमणात असता त्यांना अहमदाबाद मुक्कामी वारिश अली शहांनी रात्री दर्शन दिले व तुम्ही रामानंद आहात व तुमचा शिष्य कबीर हा पाथरी येथे साईबाबा म्हणुन जन्माला आलाय तरी तुम्ही आता ताबा घ्या व त्याचे पुढचे कार्य पहा असे आदेशित केले. हे व्यंकुसा-महाविष्णु-गोपालराव उमरखेड येथे अवतार संपवून पुन्हा पिठापुर येथे प्रकट झाले ते म्हणजेच "श्री गोपालबाबा-श्रीपाद श्रीवल्लभ-माणिक प्रभु." सोबत माणिकप्रभु संस्थानच्या पुस्तिकेचा फोटो पहावा, त्यात दिले आहे की, १८४५ साली माणिक प्रभु हुमनाबादला आले तेंव्हा मुस्लीम भक्त त्यांना महेबुब सुभानी म्हणत. गोपालबाबा महाराज एकदा माणिकनगर हुमनाबादला गेले असतां त्यांनी तेथील मुख्य जुन्या दारावर हात फिरवून म्हटले,"अरे येह तो मेरे वक्त का ही है". माणिक प्रभू : (१८१७–६५)

संदर्भ: श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरितामृत, अध्याय ४५ वा व माणिकप्रभु संस्थान पुस्तिका.



संत माणिक प्रभू. हुमणाबाद, (सोलापूर-हैद्राबाद रस्त्यावर) कर्नाटक.

अध्याय ४५ समाप्त.

# अध्याय - 46 धनगुप्तांच्या घरी, पादुका भास्कर पंडितांना देणे वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय ४६ पान २५५<br>धनगुप्ताच्या घरी जाणे- श्री पादुकांवर मंत्राक्षतांची वृद्धी होणे, पादुका भास्कर पंडितांना देणे..<br>१.भास्कर पंडितांचा निरोप घेऊन संत शंकर भट्ट आणि धर्मगुप्त निघणार इतक्यात भास्कर पंडितांना योगसमाधीत नवल होताना जाणवले. त्यांनी देवघरातील पादुका वरील मंत्राक्षतांची आपोआप वाढ होताना पाहून आज उत्तरा नक्षत्र असल्याचे लक्षात आले. ते साक्षात पद्मावती वेंकटेश्वराचे म्हणजे श्रीपादांचे रूप आहे असे म्हणून त्यातील काही अक्षता ठेवायला दिल्या. नंतर ते दोघे आशीर्वाद घेऊन निघाले.<br>काही अंतरावर एका लग्नाच्या वऱ्हाडातून बैलगाडीने प्रवास केला. त्यांना काही अक्षता ठेवायला दिल्या. नंतर एका धनगुप्त नामक वैश्य श्रीमंताच्या घोडागाडीतून कोंडी वीडू गावात पोचलो..<br>आमच्याकडे त्यांना प्रवास भाडे द्यायला पैसे नव्हते. म्हणून त्यांना मंत्राक्षता दिल्या. त्या अक्षता पाहून धनगुप्ताच्या आठवणी जाग्या झाल्या. ते म्हणाले, मी एकदा पिठीकापुरात व्यापार करायला गेलो असताना वेंकटपय्या श्रेष्ठींचे घरी मला श्रीपादांचे दर्शन झाले. तेंव्हा ते म्हणाले होते की तुमच्या मुलाच्या विवाह निमित्ताने मी आशीर्वाद पूर्वक मंत्राक्षता देईन. तुम्ही ज्याच्या कडून त्या घ्याल त्याच्या बरोबर एक वैश्य प्रमुख असेल त्यांच्या मुलाला तू तुझी मुलगी दे. त्या वैश्य प्रमुखाला १०० | २. १०० वराह धर्मगुप्ताना दिले गेले. शंकर भट्टांना ११ वराह भेट मिळाली.<br>हिऱ्यांच्या व्यापाऱ्यांचे तिथेच काही व्यवहार झाले. म्हणून धर्म गुप्तांनी तिथेच थांबून राहायचे ठरवले. शंकर भट्टांना घोडा गाडीने विजय वाटिका (विजयवाडा ) येथे धनगुप्ताच्या बंधूंच्या घरी राहायची सोय केली गेली. तेथे कृष्णा नदीत स्नान करून कनकदुर्गा मंदिरात एका संन्यासींशी ओळख झाली...<br>त्यांची पीठिकापुरात जाऊन श्रींच्या दर्शनासाठी उत्सुकता होती.<br>विजयवाडा मधून राजमहेंद्रीला गोदावरी नदीच्या पात्रात स्नान करून मार्कंडेयश्वर, कोटीलिंगेश्वराचे दर्शन घेऊन पीठिकापुराजवळ पोहोचलो.<br>तिथे श्रीपाद जिथे जन्मले ते घर, पाहिले. तिथे बापन्नाचार्यांनी भोजनाला बरोबर बसवले.<br>वेंकटपय्या श्रेष्ठींचे, नरसिंह वर्मांच्या घरी जाऊन भेटलो. सुमती आणि अप्पलराज या माता-पितांना भेटून खूप आनंद झाला. पीठिकापुरातील अनेक लोकांना भेटलो. त्यांच्या तोंडून श्रीपादांच्या दिव्य लीला प्रसंगांच्या आठवणी ऐकल्या.<br>पीठिकापुरातील विरोध करणारे लोक, ब्राह्मण यांचा रोष संपून गेलाय असे जाणवले.<br>श्रींच्या घरच्यांना श्रीपादांना प्रत्यक्ष भेट घ्यायची अत्यंत उत्सुकता होती. त्यानी सगळ्यांना एकत्र करून १८ घोडा गाडीने प्रवास सुरू झाला.<br>आठवणींच्या उमाळ्यांनी सर्वांचे डोळे पाणावत |

वराहा देऊन कोंडवीडू मधेच साक्षगंधाचा सोहळा साजरा करा. '

कोंडवीडू मधे धनगुप्ताच्या मुलाचे लग्न झाले. धर्म गुप्तांच्या कुटुंबातील सदस्यांना या लग्नाला निमंत्रण होते म्हणून ते सर्व हजर होते. मात्र धर्मगुप्त कुठे आहेत व ते केंव्हामा येणार माहित नसल्याने पंचाईत झाली होती. मुलाच्या लग्नात घनगुप्तांच्या मुलीचा साक्षगंधाचा कार्यक्रम झाला. त्यावेळी होते. अचानक दुपारच्या वेळी डोळा लागला आहे असे वाटून झोप लागली. आणि मग घोडे आकाशातून जात आहेत असे जाणवले. घोडे गाड्या जमिनीवर उतरून पुन्हा अनोळखी भागात चालू लागल्याचे जाणवत असताना पंचपहाड गावातील लोकांनी सांगितले! तो गुरुवार होता! आम्ही पंचपहाड दरबारात पोहोचलो होतो! स्वप्नवत प्रवास करत आलो.. घरच्या सर्वांचे भेटीचा तो अवर्णनीय सोहळा होता.

अध्याय ४६ समाप्त.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय - 47 श्रीपाद कुणालाही धर्मकर्म मोजमापात देतात

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| ४७ पान २५८. श्रीपाद कुणालाही धर्म कर्म मोजमापात देतात शंकर भट्ट सांगतात. पीठिकापुरातून १८ गाड्यांनी श्रींचे आप्त परिवार आकाश मार्गाने आला. ते कसे काय घडले? या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न केला असता श्रींच्या कथनातून जे कळले ते असे... आजोबा बापन्ना अवधानी, आपणास माहित आहे की भारद्वाज महर्षींनी खूप प पूर्वी पीठिकापुरात सवितृ काष्ठ चयन याग करून दत्त प्रभूंच्या अवतारस्वरुपात आगमनाची आळवणी केली होती.. तुम्ही देखील श्रीशैलात सूर्य मंडलातून शक्तिपात केला होतात. त्यामुळे मला अवतार घ्यावा लागला. देशकाल मी लांबवू शकतो तसा संकुचितही करू शकतो. अंतरिक्षातील ग्रहतारे, खगोल, मला चेंडू समान आहेत. मी देऊ शकणार नाही असे वरदान नाही. मी काही करू | २. शकत नाही असे कार्यच नाही. मी तुम्हाला ज्या पद्धतीने पीठिकापुरातून आणले ते मी दत्त आहे हे कळावे म्हणूनच. माया नाटक कपट सूत्रधारी लीला विनोद करत सर्व नातलगांच्या मनोकामना पूर्ण करून श्रींनी त्यांना परत पीठिकापुरात पोहोचते केले. हे सर्व प्रत्यक्ष अनुभवले असताना देखील शंकर भट्ट, श्रींच्या समोर बसून हे आत्ता घडलेल्या साक्षी असूनही मी पार गोंधळून गेलो. कुठल्या तरी राक्षसी मायेचे आपण बळी तर ठरलो नाही ना? असा विचार करत राहिले. (यामधील घटनाचक्रात सहभागी होऊनही त्याबाबत संभ्रमित होणे मानवी मनाचा खेळ आहे असे दर्शवून श्रींनी अविश्वास दाखवणारे तर कधीच मानण्याचा प्रयत्न करणार नाहीत. कारण ते त्यांच्या पूर्व कर्मातून निर्माण झालेल्या मानसिकतेतून बाहेर येऊ शकत नाहीत असे सुचवतात?) अध्याय ४७ समाप्त ।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।। |

# अध्याय - 48

# पंचदेव पहाडातील दरबार विवरण

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४८ पान २६१<br>पंचदेव पहाडातील दरबार विवरण<br>शंकर भट्ट श्रींच्या दिनचर्या, नित्य कार्यक्रम सणवार साजरे कसे होत याचे संक्षिप्त वर्णन करताना...<br>कथाभाग<br>शंकर भट्ट म्हणतात, त्यांना अनेक कामे करावी लागत. भक्त येताना ज्वारी तांदूळ, रागी, भाजीपाला आणत. शंकर भट्ट स्वतःयेणार जाणार भक्तांची राहायची, भोजन व्यवस्था पहायचे काम करत. रोज किती भाविक येतील याचा अंदाज न आल्यामुळे त्यांनी बनवलेला स्वयंपाक संपत आला तर कमंडलूतील जल प्रोक्षण करून जितके येतील तितक्याची सोय होत असे. स्वतःश्रींचा आहार मित होता. जेवण बनवणे, पत्रावळी बनवणे, उष्टी खरकटी भांडी धुवून ठेवणे, पिण्याचे पाणी, श्रींच्या स्नान संध्येची तयारी करून ठेवणे, हार, पुजा सामग्री, याची मांडणी करून ठेवणे वगैरे कामे करून घेत.<br>३. वातावरण प्रेमाचे, मोकळे आणि सार्वजनिक वाटे. रविवारचा दिवस योगविषयक चर्चा, सोमवारी पुराण कथा व त्यातील मर्मे, मंगळवारी उपनिषद बोध, बुधवारी वेदांत प्रवचन, शुक्रवारी कधी कधी कुरवपुरात भरत असे. एरव्ही स्त्रियांना बोध आणि महात्म्य कथन करून हळकुंड देऊन त्यांचे समाधान करत. प्रत्येकाच्या धर्म क्रमानुसार फल देत असतो. आपल्यापेक्षा वयाने मोठ्या स्त्रियांना, कधी माते, सुमती, तर कधी अनसूया माते म्हणून संबोधत. कमी वयाच्या स्त्रियांना, अग विद्याधरी, अग राधा, अग सुरेखा असे बोलवत. | 2. दरबार व्यवस्था - श्रींची महती वाढू लागल्याने त्यांना प्रत्यक्ष भेटून आपल्या समस्या सोडविण्यासाठी आशीर्वाद मिळवण्यासाठी लोकांची गर्दी होऊ लागली. श्री नदीच्या पात्रातून पायी चालत येत. प्रत्येक पावलांच्या ठिकाणी कमल उमलले जाऊन त्यांची लाकडी पादुकांची पावले त्यावर पडत आणि ते पुढे सरकले की आपोआप लुप्त होत. इतके अदभूत दृष्य पाहून सुरवातीला चकित व्हायला होत असे. नंतर पाहून पाहून आमच्या डोळ्यांना सराव झाला. गुरुवारी पंचदेव पहाडाच्या बाजूला नदीच्या तीरावर एक जागा बांधून घेऊन तिथे श्रींच्या दर्शनासाठी लोकांची सोय केली गेली. भक्तांच्या अडीअडचणी शांतपणे ऐकून घेऊन त्यांना अभयदान देत. त्यांच्या आधीच्या व्याधी दूर करत. भक्त जेवताना त्यांना वाढणे, काहींना आग्रह करून तोंडात घास भरवणे, वगैरेमुळे भक्तांच्या जवळिकेतून आपुलकी भावना व्यक्त होत असे. शिवाशीव, उच्च नीच, स्त्री पुरुष असा भेदभाव नसल्याने<br>४. लहान मुलांना अरे सोन्या, तर वरिष्ठांना आजोबा, आजी प्रेमाने संबोधत. हाक मारत असत. अठरा पगड जातीच्या लोकांना कुठलाही पक्षपात न करता त्यांच्या मुलासारखे वागवत. त्यांची पूजा अर्चना करणाऱ्याला ऐहिक आणि पारमार्थिक लाभ मिळतील. कुणाचा द्वेष करू नका. श्रींच्या दिव्य वचनांनुसार वागल्यास |

| | |
|---|---|
| | जीवन तरून जाल. अशा प्रकारे उपदेश करत. अध्याय ४८ समाप्त. |

(संकलित माहिती : कृष्णा नदीच्या पात्रात कुरुगड्डी हे बेट आहे. तिथे श्रींचे वास्तव असे. सध्या या ठिकाणी श्रींच्या पादुकांची प्रतिष्ठापना केली गेली आहे. या बेटाच्या उत्तर तीरावर पंचपहाड भाग आहे. बेटाच्या दक्षिण तिरावर शंकर भट्ट आणि काही शिष्य राहात असावेत. अटकूर गावाकडून येताना तो भाग लागतो...



... नदीचे पात्र रुंद आणि भरपूर पाणी असलेले त्यात बुट्टी नावेचा व्यवसाय करून नदी पार करायची सोय पूर्वापार चालत आलेली आहे. बुट्टी खूप बळकट, गोल वेळू वळून अन्य लाकडी सामान वापरून बनवलेली असते. आजकाल तळाला प्लास्टिकच्या चादरी अंथरून ओले न होता बसता येते. आकार मोठा असल्याने १० - १५ माणसे सामानासकट आरामात बसून प्रवास करू शकतात.)

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# अध्याय - 49

# श्रीपादांचे कर्म विध्वंस विधान / ३३ संख्या विशेष

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४९ पान २६४<br>श्रीपादांचे कर्म विध्वंस विधान / ३३ संख्या विशेष - कुरुगड्डी मधील त्यांचे कार्यक्रम<br>शंकर भट्टांना उद्देशून श्रींनी म्हटले, मी एक अनुष्ठान अग्निविद्या म्हणून करत आहे. तर तू चूल पेटवून अन्न तयार करण्याची उपासना करतोस. ही उपासना आणखी ९ वर्षे चालू राहील. (यावरून हे कथन श्रींच्या भेटी नंतर १३४१ च्या सुमारास केले गेले असावे. पोथीत त्याचा उल्लेख अगदी शेवटच्या अध्यायात होत आहे.)<br>पाठीची मणके ३३, रुद्र गणांचा आकडा ३३, योगशास्त्राचे | 2. उपासकांत ३३ व्या वर्षांत अनेक बदल घडतात. मी जरी ३० वर्षे कारणरूपी शरीरात असलो तरी नंतर ३ वर्षे तेजोमय रूपाने श्रद्धाळूंना दर्शन देईन. तू मात्र मी निजधामाला गेल्यावर चूल पेटवून भक्तांच्या करिता अन्न भोजन बनवू नकोस. येणाऱ्या भाविक ते आपले आपण बनवतील. काही भक्तांच्या समस्या दूर करताना श्रींनी एका नववधूच्या नवऱ्याला जीवनदान दिले. ब्राह्मणाला जळत्या लाकडाच्या डागण्या सोसावयाला लावून त्याचे दारिद्र्य नष्ट केले.<br>अध्याय ४९ समाप्त.<br>।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।। |

# अध्याय - 50 गुरूनिंदा - शाप निवृत्ती - नामसंस्मरण महिमा

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ५० पान २६६<br>1. एकदा श्रीपादवल्लभ शंकर भट्टांना म्हणाले, मी वायुयज्ञ सुरवात करणार आहे त्या सुमारास एक पोटदुखीने त्रस्त वृद्ध आला. तू पूर्वजन्मात लोकांना शब्दांच्या बाणांनी घायाळ करत असे यावर आता वायुतत्वाचा उपाय म्हणजे माझ्या समोर पुढील तीन रात्रंदिवस जप करण्याचा आदेश दिला. | 2. तो श्रीपादवल्लभ दिगंबरा हे नामस्मरण करत राहिला! नाम जिभेवर नाचत राहिले तर पवित्र बोलण्याची सवय लागते. मन देवावर केंद्रित केले तर मन पवित्र होते. या प्रमाणे मन, वाचा आणि शरीर शुद्धी होते. मानवाला त्रिकरण शुद्धीची आवश्यकता आहे. श्रींची श्रद्धापुर्वक प्रार्थना केली तर बलिष्ठ कर्मफळ देखील सुकर होते.<br>अध्याय ५० समाप्त.7 |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।